

# चिंबाक्षरी

**ह्या अंकात चिंब भिजा दिग्गज कवींच्या पाऊस कवितांनी..**


संपादक -

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सहसंपादक -

सोनाली घाटपांडे (पुणे)

भारती सरमळकर (मुंबई)

सचिन काकडे (मुंबई)


नेटअक्षरी


ई साहित्य प्रकाशन

वर्ष : दूसरे,अंक : २१

दिनांक : २६.०७.२०१०


हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com

# * टपटप थेंब वाजती *

टपटप थेंब वाजती,गाणे गातो वारा
विसरा आता पाटी पुस्तक,मजेत झेला धारा
पाऊस आला रे पाऊस आला

घराघरावर,कौलारावर,आले झिमझिम पाणी
गुणगुणती झाडांची पाने हिरवी हिरवी गाणी
अवती भवती भिजून माती,सुगंध भरला सारा

काळ्याभोर ढगांना झाली कोसळण्याची घाई
इवले इवले पंख फुलवूनी गाते ही चिऊताई
आनंदे हंबरते गाई समोर विसरुन चारा

मला न कळता पहा कसे हे पाय लागले नाचू
फुलांसारखे थेंब उतरती किती फुले मी वेचू
ता थै ता थै मोर नाचती भिजला चिंब पिसारा

- मंगेश पाडगावकर

# * आला पाऊस *

आला पाऊस मातीच्या वासात गं
मोती गुंफित मोकळ्या केसांत गं

आभाळात आले,काळे काळे ढग
धारा कोसळल्या,निवे तगमग
धुंद दरवळ,धरणीच्या श्वासात गं

कोसळल्या कशा,सरीवर सरी
थेंब थेंब करी नाच पाण्यावरी
लाल ओहळ वाहती जोशात गं

लिंबोळयांची रास कडुनिंबाखाली
वारा दंगा करी,जुई शहारली
चाफा झुरतो,फुलांच्या भासात गं

झाडांवरी मुके पाखरांचे थवे
वीज लालनिळी,कशी नाचे लवे
तेजाळते उभ्या अवकाशात गं

वीज कडाडता,भय दाटे उरी
एकली मी इथे,सखा राहे दूरी
मन व्याकुळ,सजणाच्या ध्यासात गं

**- शांता शेळके**



# * घन घन माला *

घन घन माला नभी दाटल्या,कोसळती धारा
केकारव करी मोर कान नी उभवून उंच पिसारा

कालिंदीच्या तटी श्रीहरी
तशात घुमवी धुंद बासरी
एक अनामिक सुगंध येतो ओल्या अंधारा

वर्षाकालिन सायंकाली
लुकलुक करिती दिवे गोकुळी
उगाच त्यांच्या पाठीस लागे भिरभिरता वारा

कृष्णविरहिणी कोणी गवळण
तिला अडविते कवाड,अंगण
अंगणी अवघ्या तळे साचले,भिडले जल दारा

**- ग.दि.माडगूळकर**

# * ए आई मला पावसात जाऊ दे *

ए आई मला पावसात जाऊ दे
एकदाच गं भिजूनी मला चिंब होऊ दे

मेघ कसे बघ गडगड करिती
विजा नभांतून मला खुणविती
त्यांच्यासंगे अंगणात मज खुप खुप नाचू दे

खिडकीखाली तळे साचले
गुडघ्याइतके पाणी भरले
तऱ्हेतऱ्हेच्या होड्यांची मज शर्यत गं लावू दे

बदकांचा बघ थवा नाचतो
बेडूक दादा हाक मारतो
पाण्यामधूनी त्यांचा मजला पाठलाग करु दे

धारेखाली उभा राहूनी
पायाने मी उडवीन पाणी
ताप,खोकला,शिंका,सर्दी वाट्टेल ते होऊ दे

ए आई मला पावसात जाऊ दे
एकदाच गं भिजूनी मला चिंब होऊ दे

**- वंदना विटणकर**

## * झिमझिम झरती श्रावणधारा *

झिमझिम झरती श्रावणधारा धरतीच्या कलशात
प्रियाविण उदास वाटे रात

बरस बरस तू मेघा रिमझिम,आज यायचे माझे प्रियतम
आतुरलेले लोचन माझे बघती अंधारात

प्रासादी या जिवलग येता,कमळमिठीमध्ये भृंग भेटता
बरस असा की प्रिया न जाईल माघारी दारात

मेघा असशी तू आकाशी,वर्षातून तू कधी वर्षसी
वर्षामागून वर्षति नयने,करिती नित बरसात

**- मधुकर जोशी**

# * नको नको रे पावसा *

नको नको रे पावसा,असा धिंगाणा अवेळी
घर माझे चंद्रमौळी आणि दारात सायली

नको नाचू तडातडा असा कौलारावरुन
तांबे सतेलीपातेली आणू भांडी मी कोठून ?

नको करु झोंबाझोंबी,माझी नाजूक वेलण
नको टाकू फुलमाळ अशी मातीत लोटून

आडदांडा नको येऊ झेपावत दारातून
माझे नेसूचे जुनेर नको टाकू भिजवून

किती सोसले मी तुझे,माझे एवढे ऐक ना
वाटेवरी माझा सखा,त्याला माघारी आण ना

वेशीपुढे आठ कोस,जा रे आडवा धावत
विजेबा कडाडून मागे फिरव पांथस्थ

आणि पावसा राजसा,नीट आण सांभाळून
घाल कितीही धिंगाणा,मग मुळी न बोलेन

पितळेची लोटीवाटी,तुझ्यासाठी मी मांडीन
माझ्या सख्याच्या डोळ्यांत,तुझ्या विजेला पूजीन

- इंदिरा संत



# * घन ओथंबून येती *

घन ओथंबून येती,बनांत राघू भिरती
पंखावरती सर ओघळती,झाडातून झडझडती

घन ओथंबून झरती,नदीस सागर भरती
डोंगर लाटा वेढित वाटा,वेढित मजला नेती

घन ओथंबून आले,पिकांत केसर ओले
आडोशाला जरा बाजूला,साजन छैल छबिला घन होऊन बिलगला

**- ना. धो. महानोर**



# * ये रे घना *

ये रे घना,ये रे घना
न्हाऊ घाल माझ्या मना

फुले माझी अळुमाळू,वारा बघे चुरगळू
नको नको म्हणतांना,गंध गेला रानावना

टाकूनिया घरदार नाचणार नाचणार
नको नको म्हणतांना,मनमोर भर राना

नको नको किती म्हणू,वाजणार दूर रेणू
बोलावतो सोसाट्याचा,वारा मला रसपाना

ये रे घना,ये रे घना
न्हाऊ घाल माझ्या मना

**- आरती प्रभू**

# * रिमझिम *

रिमझिम पाऊस पडे सारखा,यमुनेलाही पूर चढे
पाणीच पाणी चहूकडे गं बाई,गेला मोहन कुणीकडे

तरुवर भिजले,भिजल्या वेली,ओली चिंब राधा झाली
चमकून लवता वरती बिजली,दचकून माझा ऊर उडे गं बाई

हाक धावली कृष्णा म्हणूनी,रोखुनी धरली दाही दिशांनी
खुणाविता तुज कर उंचावूनी,गुंजत मंजुळ मुग्ध चुडे गं बाई

जलाशयाच्या लक्ष दर्पणी,तुझेच हसरे बिंब बघूनी
हसता राधा हिरव्या वनी,पावसातही ऊन पडे गं बाई

- पी.सावळाराम

# * बाई या पावसानं *

बाई या पावसानं,लावियली झिमझिम
भिजवलं माळरान,उदासलं मन

दिनभर देई ठाण,रात्रीस बरसून
सकाळीच लोपविलं ऊन छान छान
बाई या पावसानं

फुलली ही जाई जुई,बहरुन वाया जाई
पारिजातकाची बाई,कशी केली दैन
बाई या पावसानं

नदीनाले एक झाले,पूर भरूनिया चाले
जिवलग कोठे पडे बाई अडकून
बाई या पावसानं

**- आ.रा.देशपांडे उर्फ अनिल**

# * आली आली सर ही ओली *

आली आली सर ही ओली,खुलवित धुंद अशी बरसात
छुम छुम पायी पैंजण बांधून सजले मी दिनरात
आली आली सर ही ओली

मला प्रितीची झाली बाधा,गोकुळची झाले राधा
नंदनवन खुलले,फुलले माझिया ह्रदयात
आली आली सर ही ओली

हसते मजला यमुनेचे जळ,कदंब हसतो गाली अवखळ
हरीची मुरली मधुर छेडिते धून नवी अधरात
आली आली सर ही ओली

दृष्ट लागू नये सौख्याला,अनुपम या सौभाग्याला
मोद मनी मानसी दाट मावेना गगनात
आली आली सर ही ओली

**- गंगाधर महांबरे**

# * टपटप *

टपटप टपटप काय बाहेर वाजतंय ते पाहू
चल गं आई,चल गं आई,पावसात जाऊ

भिरभिरभिर अंगणात बघ वारे नाचतात
गरगरगर त्यासंगे,चल गिरक्या घेऊ

आकाशी गडगडते म्हातारी का दळते ?
गडाडगुडूम गडाडगुडूम ऐकत ते राहू

ह्या गारा आल्या सटासटा आल्या चल चटाचटा
पट पट पट वेचूनिया ओंजळीत घेऊ

फेर गुंगूनी धरु,भोवऱ्यापरी फिरु
'ये पावसा घे पैसा' गीत गोड गाऊ

पहा फुले,लता,तरु,चिमणी,गाय,वासरु
चिंब भिजती,मीच तरी का घरात राहू ?

- श्रीनिवास खारकर

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा
ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी
आमचा उत्साह द्विगुणीत होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे
६0000 मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.
त्या व्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन वाचणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.
हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या
आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा
हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच
एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा
आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

— ई साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामुल्य ई साप्ताहिके —

स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम , बाल नेटाक्षरी , ई श्टाप

— प्रसिध्द झालेली ई बुक्स —

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,
तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान, ई शाळा ,
तो , मी आणि सिगरेट

आमची ई बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी - esahitya@gmail.com

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com